राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत तलाठी प्रशिक्षण
कार्यक्रमाच्या खर्चासाठी निधीचे वितरण.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

## शासन निर्णय क्रमांकः पुरवणी-२०१४/प्र.क्र.४८१/ई-१०

१ ला मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०० ०३२
तारीख: १२ मार्च, २०१५

**वाचा :-**

१) **शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांकः तप्रशि २०१२/प्र.क्र.२४२अ/ई-१०, दि.२४ मार्च, २०१४**
२) **महसूल व वन विभाग, पत्र क्र. तप्रशि-२०१४/प्र.क्र.३४२/ई-१० दि. १६/०७/२०१४**
३) **शासन परिपत्रक क्रमांक: वित्त विभाग, अंदाज २०१३/ प्र.क्र.८५/ अर्थसंकल्प-३, दि.२.१.२०१५**
४) **शासन परिपत्रक क्रमांक: वित्त विभाग, अंदाज २०१३/ प्र.क्र.८५/ अर्थसंकल्प-३, दि.९.२.२०१५**
५) **शासन निर्णय क्रमांक: सामान्य प्रशासन विभाग, क्र.टीआरएन-२०१४/४४०/प्र.क्र.६६/१४/ १२-अ, दि.१.११.२०१४**

**प्रस्तावना :-**

संदर्भाधिन शासन निर्णय क्र.१ अन्वये तलाठी संवर्गातील सरळ सेवेने नियुक्त झालेल्या कर्मचा-यांना महसूल प्रबोधिनी येथे चार महिन्यांचे पायाभूत प्रशिक्षण व एका अनुभवी तलाठी यांच्या कार्यालयामध्ये दोन महिन्यांचे प्रशिक्षण असा एकूण सहा महिन्यांचा प्रशिक्षण कार्यक्रम निश्चित करण्यात आला आहे. सदर प्रशिक्षणासाठी आवश्यक असणा-या निधीची माहिती संदर्भाधिन पत्र क्र.२ अन्वये सर्व विभागीय आयुक्त कार्यालयांकडून मागविण्यात आली होती. त्यानुषंगाने सर्व विभागीय आयुक्त कार्यालयांनी सादर केलेल्या माहितीस अनुसरून तलाठी प्रशिक्षणासाठी रक्कम रू.१२,०७,९६,७००/- एवढा निधी पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. वित्त विभागाने संदर्भाधिन शासन निर्णय क्र.४ अन्वये ७५% या मर्यादेत योजनांतर्गत अर्थसंकल्पित निधी वितरीत करण्यास सहमती दिली आहे. त्यानुसार शासनाने आता खालिलप्रमाणे निधी वितरीत करण्याचा निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :-**

सर्व विभागीय आयुक्त कार्यालयांनी केलेल्या मागणीचा विचार करून सरळ सेवेने नियुक्त तलाठ्यांच्या प्रशिक्षणासाठी खालिल तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | महसूली विभाग | विभागाने नोंदविलेली मागणी (रू.) | वितरीत करावयाचा निधी (रू.) |
|---|---|---|---|
| १ | औरंगाबाद | ७१,३७,०००/- | ७१,३७,०००/- |
| २ | अमरावती | १,४२,७४,०००/- | १,४०,४०,०००/- |
| ३ | पुणे | १,२९,४१,७००/- | १,१०,००,०००/- |
| ४ | नाशिक | ६,०८,४०,०००/- | ३,९३,५६,०००/- |
| ५ | नागपूर | ५९,८४,०००/- | ५९,८४,०००/- |
| ६ | कोकण | १,९६,२०,०००/- | १,३०,८०,०००/- |
| | **एकूण** | **१२,०७,९६,७००/-** | **९,०५,९७,०००/-** |

२. सदर खर्च मागणी क्र. "सी-४, मुख्यलेखाशिर्ष २०५२-सचिवालय व सर्वसाधारण सेवा, ०० ००३, प्रशिक्षण (००) (०१), शासकीय कर्मचा-यांना प्रशिक्षण (२०५२ ५२०५) (दत्तमत) योजनांतर्गत, २०-इतर प्रशासकीय खर्च" या उद्दीष्टामधून सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी मंजूर झालेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. सदर खर्च सामान्य प्रशासन विभाग, संदर्भ क्र. ५, दि. १/११/२०१४ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या निकषाप्रमाणे खर्च करण्यात यावा. तसेच विभागीय आयुक्त कार्यालयाने आर्थिक वर्ष सन २०१४-१५ मधील सदर प्रशिक्षणावरील खर्च मंजूर अनुदानाइतका सिमित ठेवावा. तसेच आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र महालेखापाल, लेखापरीक्षा महाराष्ट्र-१/२ व शासनास अविलंब सादर करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११२११४३७३५७४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Vitthal Veer

Digitally signed by Madhav Vitthal Veer
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3c0e93ab894790967228875f0b4fd8c2fda8590b77ae2ea700bf19e91a673afc, cn=Madhav Vitthal Veer
Date: 2015.03.12 14:54:11 +05'30'

**(डॉ. माधव वीर)**

शासनाचे उप सचिव

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. सर्व विभागीय आयुक्त
४. वित्त विभाग (व्यय-९) (अर्थसंकल्प-६)/ नियोजन विभाग का.१४७५, मंत्रालय, मुंबई-३२.
५. कक्ष अधिकारी, ब-१/ ब-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. निवडनस्ती, कार्यासन ई-१०.